## श्रीज्ञानेश्वरी

गेल्या सात शतकापासून
श्रीज्ञानेश्वरी या ग्रंथाने
मराठी मनाला मोहून टाकले आहे.
ज्ञानदेवांनी आपल्या
वाणीने 'बोली अरूपाचें' रूप
दाखविले आहे. महाराष्ट्रभर
खेड्यापाड्यात पसरलेला वारकरी
समाज हा श्रीज्ञानेश्वरी आणि



ाठी

प

# ॥ श्री ज्ञानेश्वरी ॥

卐

आशीर्वाद : प. पू. आचार्य किशोरजी व्यास

ॐ नमो ज्ञानेश्वरा : ह. भ. प. भानुदास महाराज देगलुरकर

प्रस्तावना : ह. भ. प. विवेकानंद ज्ञानेश्वर वासकर महाराज

संयोजक

श्री. दा. का. थावरे

श्री. श्री. अ. लिमये

श्री. तु. ह. कुलाल

श्री. सु. स. देशमुख

---

प्रकाशक

रा. बा. यरमवार

अध्यक्ष

श्री. ज्ञानेश्वरी माऊली सेवामंडळ, सोलापूर

---

श्री. ज्ञानेश्वरी संजीवनी समाधी सप्तशताब्दि संवत्सर

शके १९१८

श्रध्दा मुल्य पंचीवस रुपये

प्रकाशक
**श्री. राजाराम बाबाजी यरमवार**
अध्यक्ष : **श्री ज्ञानेश्वर माऊली सेवा मंडळ**
२७ साखर पेठ, सोलापूर

प्रथमावृत्ती : **१०,००० प्रती**
द्वितीयावृत्ती : **१५,००० प्रती**



मुद्रक : **चेरी ऑफसेट प्रिंटीग अँड पॅकेजिंग**
इंडस्ट्रिज प्रा. लि. सोलापूर
फोन : ६२९५०० / ५७२२९



श्रध्दामुल्य रुपये **पंचवीस**
मुखपृष्ठ चित्र : **श्री सपार ब्रदर्स, सोलापूर**

श्री ज्ञानेश्वरी परायण स्वस्त आवृत्ती प्रत
श्री ज्ञानेश्वरी गाथा प्रकाशन उपसमिती

**श्री. रा. बा. यरमवार** **श्री. गणेशजी मानधनिया**
**श्री. बाबूराव कुनगुलवार** **श्री. तु. ह. कुलाल**
**श्री. श्री. अ. लिमये** **श्री. दा. का. थावरे**

श्री ज्ञानेश्वरी माऊली सेवामंडळ-विश्वस्त
**श्री. रा. बा. यरमवार, श्री. एम. बी. पोगूल, श्री. गणेशजी मानधनिया**
**श्री. सूर्यनारायण रघोजी, श्री. द. रं. पंपटवार, श्री. गो. गों. शेटे**
**श्री. बाबूराव कुनगुलवार, श्री. मुरलीधरजी भुतडा, श्री. दा. का. थावरे**

संयोजक : **श्री. दा. का. थावरे, श्री.** जयंत सावंत,
**श्री. म. भि. नाईक, श्री. तुकाराम बुवा जाधव**

## प्रकाशकाचे निवेदन

# धर्मकीर्तन सिध्दि गेले

श्रीमन्महा ज्ञानेश्वर माऊलीच्या कृपेने आज त्यांच्याच संजीवन समाधी सप्तशताब्दि संवत्सरात श्री ज्ञानेश्वरी ग्रंथाची स्वस्त मुल्यातील पारायण प्रत प्रसिद्ध होत आहे. ही परमभाग्याची घटना आहे. ज्ञानेश्वरीसारखा अलौकीक अपूर्व आणि अनन्य साधारण ग्रंथ हा महाराष्टीयांचा परमोच्च मानबिंदु आहे. मराठी साहित्याचा अलंकार, अध्यात्माचे भांडार, मानवी जीवनाचे गीत गाणारे मंदिर, कर्म-भक्ती, ज्ञान, योग, धर्म, नीती, वैराग्य आणि अध्यात्म विचारांतील सर्वच प्रमेयांना स्पर्श करणारा ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ नाही.

ज्ञानेश्वरी आणि श्रीतुकाराम महाराजांची गाथा हे वारकऱ्यांचे उपासना ग्रंथ आहेत. 'भाव अक्षराची गोठी । ब्रह्मज्ञानाने गोमटी ॥' अशी ज्ञानदेवी तिच्या उपासकाला आत्मानंदाचे स्वानंद साम्राज्य बहाल करते. अशा या महाराष्ट्रातील खेड्यापाड्यांतील प्रत्येक घरात आणि प्रत्येकाच्या अंतःकरणी असेलेल्या ग्रंथांचे मूल्य आज आकाशाला भिडले आहे. भाविक वारकऱ्यांच्या खिशाला हे मूल्य परवडत नाही. म्हणून श्री ज्ञानेश्वरी, गाथा, भागवत, श्री चोखाबाराय, श्रीसांवतामाळी, आदि संतांचे ग्रंथही अल्पमूल्यात देण्यासाठी देणग्यांचे आवाहन मंडळातर्फे करण्यात आले. त्याला अतिशय चांगला प्रतिसाद मिळाला सुमारे चार लाखापर्यंत देणग्या संकलित करून वीसहजार ज्ञानेश्वरी ग्रंथ व श्रीतुकाराम महाराजांच्या दहा हजार गाथा प्रती मुद्रित करून त्या अनुक्रमे रू. पंचवीस व पंचेचाळीस या स्वस्त किंमतीत देण्याची योजना आहे.

या योजनेला प्रथमतः येथील एक ख्यातकीर्त व्यापारी श्री द. रं. पंपटवार यांन पन्नास हजारांची देणगी देवुन कार्यास चालना दिली. येथील एक उद्योगपती श्री दत्ताण्णा सुरवसे, प्रसिद्ध कॉंट्रक्टर श्री बिपीनभाई पटेल आणि त्यांच्या सहकारी मंडळींनी मोलाची मदत केली. या योजनेस सोलापूर महानगरपालिकेने पन्नासहजार रुपये देण्याचे अश्वासन दिले आहे. तसेच पंढरपूरचे आमदार श्री सुधाकरराव परिचारक यांनीही पंचवीस हजार रुपये पंढरपूर अर्बन बँककडून मिळवून देण्याचा प्रयत्न करू असे अश्वासन दिले आहे. देणगी निधी संकलनाचे कामी श्री तु. ह. कुलाल, श्री सु. स.

देशमुख इंजि., श्री श्री. अ. लिमये यांनी थावरे यांना सक्रियं सहयोग दिला. यासर्वांबद्दल कृतज्ञता व्यक्तवून ठेवतो.

या ग्रंथास थोर संतमंडळी प. पू. आचार्य किशोरजी व्यास, ह. भ. प. भानुदास महाराज देगलूरकर, ह. भ. प. विवेकानंद वासकर महाराज यांनी आशीर्वाद दिले ख्यातनाम साहित्यीक डॉ. निर्मलकुमार फडकुले यांनी ज्ञानदेवांच्या अलौकीक जीवनकार्याचे दर्शन घडविले. या सर्वांचे ऋण शिरी मिरवावे असे आहे.

श्री ज्ञानदेवांचे सुंदर चित्र श्री सपार ब्रदर्स या ख्यातकीर्त चित्रकार कलाकारांनी करून दिले - येथील प्रथितयश मुद्रक चेरी ऑफसेट प्रा. लि. चे श्री सुजीत देसाई आणि श्री विजयदास यांनी ज्ञानेश्वरीची छपाई अंतरबाह्य सजवली या सर्वांचे अंतःकरणपूर्वक आभार!

'सत्य संकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ।' या न्यायाने ज्ञानोबा तुकारामांच्या असीम कृपेने या योजनेचा पहिला टप्पा पूर्णावत आहे. हे कार्य पाहून धनिकांनी यास राहाय्य करून उपकृत करावे अशी विनंती आहे.

आमच्या सेवामंडळाच्या विश्वस्तांच्या सहयोग हा तर आहेच हे कार्य आपलेच समजून ते करतात, त्यांना धन्यवाद!

किंबहुना तुमचे केले । धर्मकीर्तन हें सिद्धि गेले ।
येथ माझे जी उरले । पाईकपण ॥ ज्ञाने. १८.१७९३

**द्वितीयावृत्तीच्या निमित्ताने**

श्री ज्ञानेश्वर माऊलींच्या कृपेने त्यांच्याच संजीवन समाधी सप्तशताब्दि संवत्सरांत श्री ज्ञानेश्वरी पारायण प्रतीची दुसरी आवृत्ती आज प्रसिद्ध होत आहे. घरोघरी श्री ज्ञानेश्वरीच्या पारायणाचा महत्तम संस्कार रुजविला जावा त्यासाठी हे नियोजन आहे. महाराष्ट्रीय संतांनी धर्म जागरणाचे लोकोत्तर कार्य केले आहे. त्यांच्या वाणीचा प्रचार-प्रसार सर्वदूर झाला तर आज समाजात दिसणारी अशांती दिसणार नाही आणि श्री ज्ञानदेवांचे-

पुढती पुढती पुढती । इयाग्रंथ पुण्यसंपत्ती ।
सर्वसुखी सर्वभूती । संपूर्ण होईजे ॥

हे वचन अनुभवता येईल प्रत प्रकाशीत होण्यासाठी ज्याचे साह्य लाभले त्या सर्वांना धन्यवाद! श्री ज्ञानेश्वरी विक्रिचे कार्य पंढरपूर आळंदी या ठिकाणी पंढरी संदेश साप्ताहीकाचे धनी श्री गजानन पंढरीनाथ बीडकर यांनी अत्यंत आवडीने व निरलसपणे केले त्यांना मनोमन धन्यवाद-व आभारी
धर्मकीर्तद सिध्दि गेले.

सोलापूर
विजयादशमी शके १९१८ श्री. दा. का. थावरे (कार्यवाह) श्री. अ. लिमये (सरकार्यवाह) श्री. रा. बा. यरमवार (अध्यक्ष)

## कृतज्ञता – ऋणनिर्देश

### काय द्यावे त्यासी व्हावे उतराई

श्री ज्ञानेश्वर माऊली संजीवनी समाधी सप्तशताब्दि समारोहाचे ८ पर्व आहे. यानिमित्ताने श्री ज्ञानेश्वरी श्रीतुकाराम गाथा हे ग्रंथ भाविक वारकऱ्यांना वाजवी वा त्यापेक्षाही अल्प मुल्यात देता यावा, अशी मनिषा होती. 'भाव धरोनिया वाचे ज्ञानेश्वरी ।' अशी श्रद्धाशील वारकरी मंडळी 'त्यांच्या गांठी 'कृपाकरी हरी तयावरी ।' अशी काही अनुभुती असते. श्री ज्ञानेश्वरी आणि श्रीतुकाराम गाथा हे ग्रंथ वारकऱ्यांचे प्राणस्वरूप आहेत. महाराष्ट्राचा धर्म या संतमंडळींनी जागवून वृद्धिंगत केला. लोकसंग्रहासमवेत लोकशिक्षण आणि लोकप्रबोधन असे अपूर्व कार्य संतांनी उभे केले.

'काय सांगु आतां संतांचे उपकार ।
मज निरंतर जागविती ॥'

अशी कितीही कृतज्ञता व्यक्त केली तरी त्यांचे ऋणातुन मुक्त होता यायचे नाही. या संतांची ही वाङ्मयीन मुर्ती सर्वांच्या हाती झीज सोसून द्यावी या कल्पनेतून हा ग्रंथ साकार होत आहे. या कार्यास खालील सज्ञनांनी अत्यंत उदार, मोकळ्यामनाने आणि भक्तिभावाने देणग्या देवून उपकृत केले आहे.

'काय द्यावे त्यासी व्हावे उतराई ।
ठेवितां हा पायी जीव थोडा ॥'

अशी आमची भावना आहे. हे धर्मकार्य या उदारधी द्रात्यांच्या दातृत्वाने साकारले आहे. या सर्वांचे अपार ऋण, येथे नोंदवीत आहोत.

**आशीर्वाद देणगी**

१. वै. परम भागवत श्री धुंडा महाराज देगलुरकर — रु. १०५१
२. श्री वटवृक्ष स्वामी महाराज देवस्थान अक्कलकोट (श्री व्यं. श. गोगी अध्यक्ष) — रु. ११०००
३. श्री स्वामीसमर्थ अन्नछत्र मंडळ अक्कलकोट (श्री जनमेजय भोसले अध्यक्ष) — रु ११००१
४. श्री उज्वलानंद महाराज अचलवेर — रु. १०००

**श्रद्धा देणगी**

| | | |
|---|---|---|
| ५. | श्री दत्तात्रेय रंगनाथ पंपटवार वै. ह. भ. प. रंगनाथ महाराज परभणीकर व वै. पार्वतीबाई रंगनाथ पंपटवार यांचे स्मरणार्थ | रु. ५०१११ |
| ६. | श्री राजाराम बाबाजी यरमवार (वै. गयाबाइ यरमवाट यांचे स्मरणार्थ) | रु. १४०११ |
| ७. | श्री सतीश क. कंपनी हस्ते श्री बिपनभाई पटेल (वै महिजीभाई मोतीभाई पटेल यांचे स्मरणार्थ) | रु. १०,००० |
| ८. | श्री मेहुल क कंपनी हस्ते श्री बिपीनभाई पटेल (वै. कमलाबेन महिजीभाई पटेल यांचे स्मरणार्थ) | रु. १०,००० |
| ९. | श्री बाबुराव नरहरी खंडाळकर (वै. न. गो. खंडाळकर व सौ. भागीरथी बाई यांचे स्मरणार्थ) | रु. १०,००० |
| १०. | श्री श्रीकांत श्रीनिवास रायते (वै. श्रीनिवास विष्णुपंत रायते यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| ११. | भरत लोहार सह. औ. मजुर संस्था, सोलापूर | रु. ५००० |
| १२. | व्यंकटेश स्टील मॅं. लो. म. सं. ,, | रु. ५००० |
| १३. | हिंद स्पेअर पार्टस् मॅं. स. स. ,, | रु. ५००० |
| १४. | महाराष्ट्र कुशल कामगार लो. उ. सो. ,, | रु. ५००० |
| १५. | श्री श्रीराम सुरेशचंद्र देशमुख | रु. ५००० |
| १६. | श्री पद्माकर विश्वंभर-हराळकर (वै. नामदेवतात्या हराळकर स्मरणार्थ) | रु. ५००० |
| १७. | मे. विजय कंस्ट्रक्शन (श्री कृष्णावंती सिं. नय्यर यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| १८. | श्री जनार्दन ब्रह्मदेव शिंदे | रु. ५००० |
| १९. | श्री तुलसीराम हरिकिसन गिलडा चॅरिटेबल ट्रस्ट (श्री तुलसीराम गिलडा यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| २०. | श्री म. भि. नाईक (वै. भिमराव गंगाधर नाईक यांचे स्मरणार्थ) | रु. ५०११ |
| २१. | वै. ह. भ. प. काशीनाथ गोविंद थावरे गुरुजी यांचे स्मरणार्थ | रु. ५०११ |

| | | |
|---|---|---|
| २२. | श्री स्वाती एस. फडतरे (वै. गणपत नरहर पाटील यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| २३. | श्री सूर्यनारायण गुंडप्पा रघोजी (वै. गुंडप्पा सा. रघोजी व वै गंगम्मा यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| २४. | श्री गणेशजी मानधनिया (वै. नंदलालजी व वै. तुळसाबाई मानधनिया यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| २५. | श्री शेटे बंधु (वै. गोविंद स. शेटे यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| २६. | श्री बाबुराव पंढरीनाथ कुनगुलवार (वै. ज्ञा. ना. कुनगुलवार यांचे स्मरणार्थ) | रु. ५०११ |
| २७. | श्री मुरलीधरजी भुतडा | रु. ३००० |
| २८. | मे. मारुती लाडप्पा केंदोळे (वै. लाडप्पा सिद्धप्पा केंदोळे यांचे स्मरणार्थ) | रु. २५०१ |
| २९. | श्री श्रीपाद अनंत लिमये | रु. २००० |
| ३०. | श्री सुधाकर सर्वोत्तम देशमुख | रु. २००० |
| ३१. | श्री विश्वास पुरुषोत्तम जतकर | रु. २००० |
| ३२. | श्री रामचंद्रय्या बच्चुवार | रु. २००० |
| ३३. | श्री सोमनाथ शंकर गुळे | रु. १५०१ |
| ३४. | सौ. अरुणा श्रीधर बेंद्रे | रु. ११११ |
| ३५. | श्री मल्लप्पा व निरोळी नागदरी (वै. बसवणप्पा शि. निरोळी यांचे स्मरणार्थ) | रु. ११०१ |
| ३६. | श्री सूर्यकांत गणपतराव लवंगे | रु. १००१ |
| ३७. | सौ. मैनाताई देवीदास कुलकर्णी | रु. १००१ |
| ३८. | सह्याद्रि विद्युत का. रा. रो. (श्री आनंद पाठक) | रु. १५०० |
| ३९. | विजयकुमार दत्तात्रेय दिक्षित | रु. १००१ |
| ४०. | श्री दत्तात्रेय नागनाथ दिवटे | रु. १००५ |
| ४१. | श्री रामचंद्र वसंत सांगलीकर | रु. १००१ |
| ४२. | श्री निलकंठ अनंत देवस्थळी | रु १००१ |
| ४३. | श्री मधुसुदन जगन्नाथ बडवे | रु. १००१ |
| ४४ | श्री विठ्ठल विष्णु पाटील | रु. १००१ |
| ४५. | श्री भालचंद्र रामचंद्र बाकळे | रु. १००१ |
| ४६. | श्री शंकर गोविंद कुलकर्णी | रु. १००० |

४७. श्री मुरलीधर रंगनाथ जरिपटके रु. १०००
४८. सौ. स्मीता सुरेश लिमये रु. १०००
४९. सौ. सुचेता सुधीर लिमये रु. १०००
५०. श्री संतोष भगवंत कुंभारे रु. १०००
५१. सौ. गुलाबदेवी द्वारकानाथ असावा रु. १०००
(वै. काशीनाथ रा. असावा यांचे स्मरणार्थ)
५२. श्री जी. आर. कुलकर्णी रु. १०००
५३. श्री अमोघसिद्ध बापूराव भोपळे रु. १०००
५४. श्री नाथ दत्तात्रेय जोशी रु. १०००
५५. श्रीसंत श्रीज्ञानेश्वर मंदीर संस्थान उस्मानाबाद रु. १०००
५६. श्री निवृत्ती आनंदराव पवार रु. १०००
५७. श्री तुकाराम हणमंतराव कुलाल रु. १०००
५८. श्री दिलीप गोविंदराव भंडारे, अक्कलकोट रु. १०००
५९. सौ. ज्योती ब्रिजमोहन असावा रु. १०००
(वै. रुपचंदजी मालपाणी यांचे स्मरणार्थ)
६०. सौ. अनुसयाबाई शिवाजी गायकवाड रु. १०००
६१. श्री श्रीधर लक्ष्मण कुलकर्णी रु. १०००
६२. श्री विष्णुदासजी गोपाळ भुतडा रु. १०००
(वै. बालकिसनजी भुतडा यांचे स्मरणार्थ)
६३. सौ. प्रेमलता गिरीधारी भुतडा रु. १०००
(वै. राई पुसारामजी भुतडा यांचे स्मरणार्थ)
६४. सौ. शुभदा जनार्दन थावरे रु. १०००
(वै. द्वारकाबाई बा. पैठणकर यांचे स्मरणार्थ)
६५. श्री बंकटलाल श्रीकृष्ण तापडिया, पुणे रु. १०००
६६. श्री. रामनिवास हरिनिवास जाजू रु. १०००
६७. श्री जयंत गोविंद रायते रु. ५०१
६८. श्री घनःश्याम नारायण जोशी रु. ५०१
६९. सौ. उर्मिला मोहनलाल करवा रु. ५०१
७०. श्री एम. एस. कुलकर्णी रु. ५००
७१. श्री माधवराव रामकृष्ण पागे रु. ५००
७२. सौ. आशालता विठ्ठलराव गुंडला रु. ५००

७३. श्री सिद्रामप्पा गुरुसिद्धप्पा इंगळगी रु. ५००

७४. श्री गंगाधर सच्चिदानंद जोशी रु. ५००

७५. श्री भा. वि. अंकुलकर दादा रु. ५००

७६. किशोर दिगंबर फडणीस रु. ५००

७७. श्री ह. भ. प. राजाभाऊ राजपाठक - आशीर्वादार्थ रु. १०१

प्रथमावृत्ती प्रकाशीत झाल्यानंतर ज्या सज्जनांनी या कार्यासाठी उदारहस्ते देणगी दिली त्यांची नामावली या ठिकाणी कृतज्ञतेसह नोंदवीत आहोत.

७८ श्री. शंकर शिवराम मराठे रु. ५०१

७९ सौ. सुषमा वसंतराव हुंडेकरी रु. ५०१

८० श्री. पांडुरंग बलभीम जाधव रु. १००१
(वै. ह. भ. प. बलभीमजी जाधव गुरुजी व
वै. श्री. बनुबाई जाधव यांचे स्मरणार्थ)

८१ श्री. नंदकुमार भिकुअप्पा कुरा रु. ५००१
(वै. भिकुअप्पा शिवप्पा कुरे यांचे स्मरणार्थ)

८२ सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. रु. १०,०००
सोलापूर
(अध्यक्ष श्री. वि. गु. शिवदारे)

८३ श्री. दामोदर भिमाशंकर कुलकर्णी रु. १०,०००
(वै. ह. भ. प. भिमाशंकर कुलकर्णी व वै.
उमाबाई भिमाशंकर कुलकर्णी नाशीक यांचे
स्मरणार्थ)

८४ सौ. सुरेखा दामोदर कुलकर्णी रु. १०,०००
(वै. जगन्नाथ बापूजी जोशी व वै.
इंदिराबाई जगन्नाथ जोशी यांचे स्मरणार्थ)

८५ श्री. दत्तात्रेय रामचंद्र बेंद्रे रु. ५००

८६ श्री. भरत व भास्कर विश्वनाथ पारसवार रु. ५०००
(वै. विश्वनाथ पंढरीनाथ पारसवार यांचे स्मरणार्थ)

८७ श्री. संगमेश्वर भिमाशंकर रघोजी रु. ५०००
(वै. सौ. सुलोचनाबाई भिमाशंकर रघोजी यांचे
स्मरणार्थ)

| | | |
|---|---|---|
| ८८ | श्री. नंदकुमार, भरतकुमार, विश्वनाथ, श्रीनिवास वासुदेव रामचंद्रय्या सुरपुर यादगिर (वै. रामचंद्र मल्लप्पा सुरपुर व वै. सुशिलाबाई रामचंद्र सुरपुर यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| ८९ | श्री. श्रीकांत विश्वभंर प्रतापवार (वै. विश्वभंर वैजीनाथराव प्रतापवार, परभणी यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |
| ९० | श्री. जयप्रकाश शांताराम पाखरे (श्री. शांताराम परशुराम पाखरे यांचे स्मरणार्थ | रु. ५००० |
| ९१ | श्री. अर्जुन मारुती भोसले (वै. मारुती शिवराम भोसले यांचे स्मरणार्थ) | रु. १००० |
| ९२ | श्री. आर्मुनुद्दीन सुलेमान काझी | रु. ९१०० |
| ९३ | श्री. कुंडलीक यादवराव गायकवाड | रु. ५०० |
| ९४ | श्री. सर्जेराव, शिरीषकुमार गंगाधर गायकवाड (वै. गंगाधर कृष्णात गायकवाड यांचे स्मरणार्थ) | रु. ५००० |

जिल्हापरिषद सोलापूरचे आदरणीय अध्यक्ष श्री प्रतापसिंह मोहिते पाटील यांनी जिल्हा परिषदेद्वारा या कार्यास रु. ५०,०००/- पर्यंत मदत देवू असे अश्वासन दिले आहे.

पुनश्च या उदार दात्यासंबंधी अंत:करणपूर्वक कृतज्ञता

**सोलापूर**
विजयादशमी
शके १९१८

दा. का. थावरे
कार्यवाह

श्री. अ. लिमये
सरकार्यवाह

रा. बा. यरमवार
अध्यक्ष

॥ श्रीहरिः ॥

## हार्दिक-अभिनन्दन

कुरुक्षेत्राच्या समरांगणावर स्वजनांना पाहून युद्ध-विन्मुख झालेल्या अर्जुनाला स्वकर्तव्यास प्रवृत्त करण्यासाठीं योगेश्वर भगवान् श्रीकृष्णांनी नितान्त हितकारक दिव्य उपदेश केला. समस्त उपनिषद् वाङ्मयाचे मथित या भगवत-वाणीत भगवद्गीतेत साठविलेले आहे. प्रज्ञा-चक्षु-सन्त श्री. गुलाबराव महाराजांनी गीतेस 'जाग्रच्छ्रुति' या यथार्थ शब्दाने गौरविले तर भगवान् ज्ञानेश्वर माऊलींनी तिला वेदांचेही बीज म्हटले. सर्व आचार्य, सन्त व विचारवन्तांनी या अद्भुत उपदेशाच्या अखिल विश्वाच्या सर्वमान्य धर्मग्रन्थ म्हणून आदर केला.

परमवत्सल ज्ञानेश्वर माऊलींनी या सुन्दर ग्रन्थावर मराठी भाषेचे देशीकार लेणे चढवीत आणि त्या माध्यमाने गुरुपरंपराप्राप्त रहस्य श्रोत्यांपुढे ठेवीत कर्तव्य-विन्मुख झालेल्या जीवास शोक-मोहातून बाहेर काढून परमानन्दपदी आरूढ करण्यासाठीं शान्त-रसाचा वर्षाव अशा वाक्‌चातुर्याने केला की, जगातील कुठल्याही भाषेला मराठीचा हेवा वाटावा. हे 'गुज' सांगत असतांना उपमा-उत्प्रेक्षा-दृष्टांतादि अलंकारांनी उघडलेल्या साहित्य सोनियाच्या खाणी व झालेल्या प्रमेय रत्नांची उधळण हे सर्व इतके अपूर्व आहे की, भले भले याकडे स्तिमित होऊन पाहातच राहिले आणि यापुढे ही पाहात राहतील.

पण माऊलींचा मूळ हेतु काव्य-चमत्कृतिचा नसून भाविकांच्या हित बोधाचा आहे. म्हणून जिज्ञासु बालकांसाठी गीतेतील ज्ञानाचा आवळा अमृतरसाच्या पाकात मुरवून माऊलीने भावार्थ-दीपिकेचा मोरावळा तयार केला.

परमकृपाळु माऊलीचा हा प्रसाद सहजपणाने लोकांपर्यन्त पोंचविण्याचे पवित्र कार्य करण्यासाठीं परमात्मा ज्याला ज्याला निमित्त बनवील तो खरोखरी धन्य आहे. संजीवन समाधिच्या सप्त-शताब्दि वर्षात ज्ञानदेवीची सर्वजन-सुलभ आवृत्ति काढून 'श्री ज्ञानेश्वर माऊली सेवा मंडळ (सोलापूर)' हे गोड कार्य कर्तव्य-निष्ठेने पार पाडीत आहे. ही नितान्त अभिनन्दनीय गोष्ट आहे. याआधी ही श्रीज्ञानेश्वरी, व श्री तुकाराम गाथा यांच्या सुलभ आवृत्त्या काढून मंडळाने लोकहित व भगवत्-सेवा साधली आहे. यासाठीं प्रयत्न करणाऱ्या व तन-मन-धनाने त्यांना सहकार्य करणाऱ्या सर्वांवर भगवान् श्री पांडुरंगाच्या कृपादृष्टीची वृष्टि व्हावी.. सर्वांचे जीवन अन्तर्बाह्य उजळून निघावे व भारतमातेच्या या अमोल ठेव्याने अखिल विश्वाचे कल्याण व्हावे.. ही संजीवन समाधिस्थ श्री ज्ञानराज माऊलींचे चरणी विनम्र प्रार्थना.

इति।

धर्मश्री:. पुणे.
दि. २/४/१९९६

सन्त-कृपांकित,
किशोरव्यास:

ॐ

॥ श्री पांडुरंग प्रसन्न ॥

# ॐ नमो ज्ञानेश्वरा

श्रीज्ञानेश्वर माऊलींच्या संजीवन समाधीला सातशे वर्षे झाली. त्या सकलमंगलकारी तेजस्वी जीवनाचा प्रकाश सातशे वर्षानंतरही आपल्या भोवताली पसरलेला जाणवतो आहे. महाराष्ट्रातील गांवागांवामध्ये लोक स्वयंप्रेरणेने या शताब्दीमध्ये महोत्सव साजरे करून श्री ज्ञानदेवाविषयी प्रेम व आदर व्यक्त करीत आहेत. त्यांच्या जयजयकाराने दशदिशा दुमदुमून गेल्या आहेत आणि त्यांच्या पावन स्मरणाने लक्षावधी अंत:करणे उजळून निघाली आहेत. त्यांनी केलेल्या उपकारातून, उत्तीर्ण होण्यासाठी व त्यांच्याविषयी कृतज्ञताबुद्धि व्यक्त करण्यासाठी समाजमन ओसंडून वाहते आहे! एकनाथाप्रमाणेच 'एकाजनार्दन तुमचा दास । त्याची आस पुरवावी ॥' असे म्हणत लोक माऊलींच्यापायावर लोळण घेत आहेत. असे वाटते की आजही ही आमची अनाथाची माय आमच्याकडे अत्यंत कृपाळूपणे पाहते आहे. त्यांच्या स्नेहाळ दृष्टिपातातून वर्षणाऱ्या अमृतधारांमध्ये आपण नित्य न्हाऊन निघत आहोत.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे हे जे अस्तित्व आपल्या भोवताली आपल्याला सतत जाणवते त्याचे कारण जर कांही असेल तर ज्ञानेश्वरी! असे वाटते की ज्ञानेश्वरीच्याद्वारे ज्ञानाईमाऊली आमच्याशी बोलते आहे. ती आमच्या मागेपुढे, इकडेतिकडे उभी आहे आणि सतत आपल्या अमृतमधुरवाणीने आमच्याशी संवाद साधीत आहे. अनुभवामृत, चांगदेवपासष्टी, अभंग व हरिपाठ हे सर्व त्यांचेच बोलणे असले तरी आणि या प्रत्यक रचनेतील वाक्‌चातुर्य वेधक व अध्यात्मज्ञान बोधक असले तरी ज्ञानेश्वरीतील शब्दाशब्दातून त्यांनी

आपल्याशी जो संवाद साधला आहे त्याला तोड नाही. जणू माऊली समोर बसून अत्यंत हळुवारपणे आपल्याला आपल्या हिताचा मार्ग समजावून सांगते आहे. जसे कांही आपले बोलणे, आपल्या शंका, कौतुकाने ऐकून घेऊन त्यांना ती उत्तरे देते आहे असे वाटत राहते. ज्ञानेश्वरीचा वाचक श्रीज्ञानदेवांच्या सतत जाणवणाऱ्या अस्तित्वापासून दूर जाऊच शकत नाही. त्यांचे सान्निध्य त्याला वेढून टाकते. जो ज्ञानेश्वरीचा झाला तो ज्ञानेश्वराचा झाला! जवळ जवळ सातशे वर्षे या ग्रंथाने लोकांची मने वेधून टाकली आहेत. आत्मानुभवी संतांपासून ते सामान्य साधकापर्यंत, श्रद्धावान भाविकांपासून ते चिकित्सक अभ्यासकापर्यंत आपल्या अंतरंग विवेकसंपदेने आणि बहिरंग साहित्य सौंदर्याने या ग्रंथाने लोकांची मने आकृष्ट केली आहेत. उत्कृष्ट शिल्पकाराने नटलेले व गाभाऱ्यात परमपावन दैवताची प्रतिष्ठापना केलेले एखादे प्रसन्न मंदिर असावे तशी ज्ञानेश्वरी बाहेरी साहित्यशिल्पाने अंलकृत आणि अंतरी आत्मराजाने प्रतिष्ठित आहे. तिचे बाह्य सौंदर्य मनाला आकृष्ट करून घेत घेत आत गाभाऱ्यापर्यंत नेऊन केव्हा 'आत्मया श्रीहरीची' उराउरी भेट करून देत ते कळतही नाही! इतक्या सहजतेने, अनायासपणे आनंदतरंगांवर बसवून ज्ञानेश्वरी आपल्याला अध्यात्माच्या गहन सिद्धान्तापाशी नेऊन पोहचवते. त्यांनीच म्हटल्याप्रमाणे,

> परि भोगाचिया ऐलीकडिलिये मेरे । चित्त उभे ठेलेचि सुखा भरे ।
> ऐसे सुलभ आणि सोपारे । वरि परब्रह्म ॥'

असा अनुभव ज्ञानेश्वरी वाचताना येतो.

ज्ञानेश्वरी हा शब्दसृष्टीमधला चमत्कार आहे. श्रृंगाराला श्रृंगारणे हा साहित्यिकांचा खेळ आहे पण शांतरसालाही श्रृंगाराच्या माथ्यावर पाय ठेवण्याऐवढे सजवणे हा ज्ञानदेवांच्या हातचा मळ आहे! अरूपाला रूप देणे, अतींद्रियाला इंद्रियांच्या स्वाधीन करणे आणि अशब्दालाही शब्दाचा चमत्कार करणे असे नवल ज्ञानदेवांनी ठायी ठायी या ग्रंथात करून दाखविले आहे. म्हणूनच नामदेवराय अत्यंत अभिमानाने ज्ञानदेवांचे कौतुक सांगतात,

> परब्रह्म डोळा दावूं ऐसे वदती ।
> कोणा न ये युक्ती ज्ञानोबाची ॥

ज्ञानेश्वरीचे वर्रन श्री नामदैवराय, जनाबाई, चोखामेळा महाराज, एकनाथमहाराज इत्यादी संतांनी तर केले आहेच पण हा ग्रंथ किती सर्वांगसुंदर

झाला याची एक खूण ज्ञानेश्वरीतच आपल्याला सापडते. इतर ठिकाणी अत्यंत विनम्र असणारे ज्ञानदेव अखंड अगर्वता धारण करणारे ज्ञानदेव पण तेही या आपल्या स्वत:च्याच ग्रंथाच्या गुणांनी मोहून गेले आहेत की काय असे वाटते. श्रीमद्‌भागवतामध्ये असे म्हटले आहे (३.२.१२) की आपल्या अलंकारांनाही अलंकृत करणाऱ्या अनुपम सौंदर्याने स्वत: भगवानच काही वेळा मोहित होऊन जात. तसे स्वत:च्या हातून घडलेल्या या गीताअलंकाराचे शब्द व अर्थ--सौंदर्य पाहून ज्ञानदेवांनाही या कृतीबद्दल सार्थ अभिमान वाटला असावा. तो त्यांनी व्यक्तही केला आहे.

तैसा प्रबंधु हा श्रवणी । लागतखेंवो समाधी आणी ।
ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लावी ॥ज्ञा. १८. १७४४

या वरून या ग्रंथाच्या गुणवत्तेबद्दल त्यांची खात्री पटली होती हे स्पष्टच आहे.

हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल ।'

याविषयी त्यांना विश्वास आहे. सद्‌गुरूकृपेने निर्माण झालेल्या या ग्रंथसृष्टीपुढे विश्वामित्राची सृष्टीही त्यांना हास्यास्पद वाटते, इतके ते या ग्रंथाच्या निर्मितीने प्रसन्न आहेत. ज्ञानदेवांसारख्या ज्ञानमूर्तीला आणि कविपोषकाला हा ग्रंथ कृतकृत्यतेचा आनंद देतो यावरून या ग्रंथाचे श्रेष्ठत्व व रसाळपण! वेगळेपण सांगावयास नको! त्यांनाच या ग्रंथाचे खरे मर्म कळणार. त्यांच्या 'युक्तीची खोली' आपल्यासारख्या सामान्यांना काय कळणार?

पण ज्ञानांचा सागर असणाऱ्या ज्ञानदेवांचा हा ग्रंथ सागरासारखा अथांग खोल असला तरी तो आपल्यासाठीच त्यांनी लिहिला आहे. त्यासाठी त्यांनी विविध दृष्टांत, रूपके व संवाद यांची योजना केली आहे. या ग्रंथातील दृष्टान्त हे गीतेतील सिद्धांताशी आपल्या मनाची गाठ घालून देण्यासाठी आहेत व या ग्रंथातील सिद्धांत हे आपल्या अज्ञानाच्या गाठी उकलण्यासाठी आहेत.

'गीतार्थे विश्व भरूं ।'
'देखो आवेडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥'
'घेणें देणें सुखचिवरी । हों देई या जगा ॥'
'किंबहुना सर्वसुखी ।'

या वाक्यातून व्यक्त झालेला कळवळा आपल्यासाठीच आहे.

जरी ज्ञानदेवांनी अबालसुबोध अशा ओवी मध्ये ब्रह्मरस सुस्वादयुक्त अक्षरे गुंफली असली तरी सातशे वर्षांपूर्वी निर्माण झालेली ही गीतेवरील देशिकार टीका आजच्या वाचकांना भाषेच्या जुनेपणामुळे समजण्यास कठिण वाटते. पण हे कठिणपण केवळ कल्पनेने निर्माण केलेले आहे. आपण अपरिचित परकीय भाषा अभ्यासाने शिकतो मग आपलीच मराठी ज्ञानेश्वरी आपल्याला कळू शकणार नाही काय? न कळण्याचे कारण आपण ती भाव धरून वाचीत नाही. थोड्याशा प्रयत्नाने हा ज्ञानाचा व आनंदाचा ठेवा आपला होऊ शकतो. एकदा का ज्ञानेश्वरीच्या भाषेशी आपली ओळख झाली की मग तिचे अमृतासारखे माधुर्य आपले मन वेधून टाकील.

ज्ञानेश्वरी हा अध्यात्मशास्त्राचा ग्रंथ आहे. तो केवळ वाचनाचा ग्रंथ नाही. तो विचाराचा आणि आचाराचा ग्रंथ आहे. वाचनाने विचार जागृत झाले पाहिजेत आणि त्या विचारांचा आपल्या आचरणावर परिणाम झाला पाहिजे. कर्म, उपासना आणि ज्ञान ही जीवनाची तीन अंगे आहेत. गीता या तीन गोष्टीचा योग्य समन्वय साधून जीवन कसे जगावे हे आपल्याला शिकवणारी कांडत्रयरूपिणी कोडिसवाणी श्रुतीच आहे. जीवनाची सफलता उपनिषदांचे सार असणाऱ्या गीतेने सांगितलेल्या या तीन्ही कांडांच्या संतुलनाने साधते. श्रीज्ञानेश्वरमाउलींनी या तीन्ही अंगांचे स्वरूप, महत्त्व व फळ यांचे सुंदर विवेचन करून परमश्रेयाच्या प्राप्तीत त्यांचे स्थान कोणते याचा बोध आपल्याला कळेल अशा पद्धतीने आपल्यासमोर ठेवला आहे. जीवनात पदोपदी या या विचाराचा उपयोग आहे. तो आपण करून घेतला पाहिजे. 'अर्जुना तू परिससी । परिसूनि अनुष्ठिसी ।' याचे भगवंतालाही कौतुक आहे. त्याचे मर्म आपण ओळखले पाहिजे.

श्रीमाऊलींच्या या ग्रंथाने हजारो जीवने घडवली, समाजात सद्बुद्धीची दीपकळिका तेवत ठेवली, अध्यात्मही रसाळ करून त्याची ओढ लावली. सातशे वर्षांपूर्वी नेवाशात एका शिवमंदिरात एका सोळा वर्षाच्या बालकाने आदिनाथ शंकरांपासून चालत ओले गुरुक्रमाने लाभलेले समाधिश्वत गीतेवरील आपल्या व्याख्यानाद्वारे मुक्त हस्ताने लोकांना वाटले. सच्चिदानंदबाबांनी ते अक्षरबद्ध केले. ज्ञानेश्वरी या सार्थ नावाने सातशे वर्षानंतरही ही गीतेची भावार्थ-दीपिका उत्तरोत्तर अधिक तेजाने प्रकाशते आहे. हा प्रकाश आपल्याही जीवनात यावा यासाठी उत्सुक असणाऱ्या ज्ञानेश्वरी वाचकांची संख्या अत्यंत वेगाने वाढते आहे.

'पुढती पुढती पुढती । इया ग्रंथ पुण्यसंपत्ती ।
सर्वसुखी सर्वभूती । संपूर्ण होईजो ॥'

अशी सदिच्छा बाळगणाऱ्या सोलापूरच्या श्रीज्ञानेश्वरमाउली सेवा मंडळाच्या सदस्यांनी सर्वस्तरातील साधकांना हा ग्रंथ अल्प किंमतीत उपलब्ध व्हावा म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या संजीवनसमाधीच्या सप्तशताब्दीत ही ज्ञानेश्वरीची प्रत प्रसिद्ध केली आहे. यापूर्वीही श्रीज्ञानेश्वरी, श्रीतुकाराम महाराजांची अभंग गाथा, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी, हरिपाठ इत्यादी ग्रंथ अत्यल्प किंमतीत त्यांनी उपलब्ध करून दिले आहेत. या सर्व कार्यामागे त्यांचा मोठा त्याग, श्रम व निष्ठा उभी आहे. विशेषत: श्री सच्चिदानंदबाबांची परंपराच पुढे चालविणारे श्री ह. भ. प. दा. का. थावरे यांचे अविरत परिश्रम व प्रेरणा या प्रकाशनामागे आहे. श्रीज्ञानेश्वरमाऊली सेवा मंडळाच्या सर्व सदस्यांनी ही तनमनधनाने त्यांना साथ दिली म्हणून हे सत्कार्य घडले.

श्रीज्ञानेश्वरमाऊलींची ही सर्वात उत्कृष्ट सेवा त्यांच्याकडून घडली आहे असे मला वाटते. ही सेवा श्रीमाऊलींनाही अत्यंत आवडेल व त्यामुळे त्यांची कृपा मंडळाच्या सर्व सदस्यांवर सदैव राहिल असा मला विश्वास वाटतो.

या प्रसिद्ध होत असलेल्या ज्ञानेश्वरीची प्रत्येक प्रत म्हणजे एक एक कमलपुष्प आहे आणि या कमलपुष्पांनी श्रीज्ञानेश्वरमाऊली सेवा मंडळाने श्री माऊलींची या संजीवनसमाधी सप्तशताब्दीत पूजा बांधली आहे. त्या पूजेत या प्रास्ताविकाच्या निमित्ताने त्यांनी मलाही आपलेपणाने सम्मिलित करून घेतले आहे; त्याबद्दल मंडळाच्या सदस्यांचा मी आभारी आहे.

श्रीज्ञानेश्वरीच्या या प्रती घराघरात पोहचून लोकांची जीवने आनंदमय करोत ही श्रीज्ञानदेवांचे चरणी प्रार्थना.

श्रीक्षेत्र पंढरपूर, भानुदासमहाराज देगलूरकर
चैत्र शु. ११, शके १९१८.

# प्रस्तावना

'कैवल्याचा अधिकारी ।
मोक्षाची सोडी बांधी करी ॥

'गीता जाण ही वाङ्मयी श्री मूर्ति प्रभूची' या उक्तीप्रमाणे श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या व्यक्तीत्व व व्यक्तिमत्वाचा मागोवा घ्यावयाचा झाल्यास श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या वाङ्मयामध्ये त्यांचे विश्वरूप दिसल्याशिवाय रहात नाही. कुंडलिनी जागृत झालेला महाकैवल्य तेजाचा हटयोगी खरा कि सगुण भक्तिचा बाराव्या अध्यायातील भक्तिचा उद्गाता खरा, कर्म ज्ञान व उपासना या वेदप्रतिपाद्य विषयाला एकाच बैठकीवर आणणारा तेरावा दर्शनकार खरा कि अलौकिक प्रतिभासंपन्न क्रांतदर्शी कवि खरा, निर्गुणाच्या प्रांगणामध्ये वावरणारा 'मोक्षमार्गाचा सांगाती खरा कि माझ्या जिवीची आवडी । पंढरपुरा नेईन गुडी' असा पंढरीचा वारकरी खरा, चिद्विलासाचे अलौकीक तत्वज्ञान सांगणारा खरा का पंढरीरायाचा वेध लागलेली विरहणी खरी. अशा विविध शंका एकाच व्यक्तिमत्त्वातून प्रगट होतात आणि त्यामध्येच श्री ज्ञानेश्वर माऊलीचे वैशिष्टय सामावलेले आहे आणि या व्यक्तिमत्त्वाचा प्रत्येक पैलु हा पूर्णतेला पोहोचलेला आहे. श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या व्यक्तित्वामध्ये एकच उणीव मला वाटते ती म्हणजे त्यांच्या व्यक्तिमत्वाच्या प्रत्येक पैलुला कुठल्याही उणीवाचा स्पर्श झालेला नाही. अगदी दृष्ट लागू नये म्हणून लौकिक जीवनामध्ये सुंदर मुखकमलावर आपण काळा टीका लावतो तसा. कोणत्याही काळा टीक त्यांच्या लौकिक अलौकिक संसारी वा पारमार्थिक जीवनामध्ये आढळत नाही.

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय सर्व जगाच्या लौकिक व पारमार्थिक क्षेत्रामध्ये मानलेले आहेत व हे पाच विषय उपभोगण्यासाठी जीवाजवळ पंच ज्ञानेंद्रिये, पंच कर्मेंद्रिये व अंत:करण अशी अकरा इंद्रिये मिळालेली आहेत. इंद्रिये या विषयात एक वैशिष्ट म्हणजे प्रत्येक इंद्रियाचा

विषय हा वेगळा असतो. उदाहरणार्थ रस हा विषय रसनेचा आहे. तो कानाचा, त्वचेचा वा डोळ्याचा विषय होऊ शकत नाही. त्या प्रमाणे एखाद्या गवयाचे गाणे कान या इंद्रियाला तृप्त करेल, परंतु ते रसनेला वा डोळ्याला सुखी करू शकत नाही. उलट काही काही गवयी गाताना एवढे तोंड वेडेवाकडे करतात की ऐकणारा डोळे झाकून घेतो. म्हणजे इंद्रिय व त्यांचे विषय हे ठरलेले आहेत. परंतु श्री ज्ञानेश्वर महाराजांचे वाङ्मय एकाचवेळी सर्व इंद्रियांना सर्व विषय देऊन सुखाऊन जाते. हा अतिशयोक्तिचा भाग नसून ही वस्तुस्थिती आहे.

१) 'साच आणि मवाळ । मितुले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥'

इथे रसना अपुरी पडते.

२) श्री माऊलीच्या शब्दाला एक सुंदर नाद आहे. ती अक्षरे उच्चारल्या बरोबरच त्यातून संगीत बाहेर पडते. अशीच एक नादाची ओवी अठराव्या अध्यायामध्ये आलेली आहे.

'मग तो सावळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।
आलिंगला स्वशरणु । भक्तराजु तो ॥'

यातील 'सकंकणु' हा शब्द उच्चारल्याबरोबरच अर्जुनाला मिठी घालताना कृष्णाच्या उजव्या हातातील सुवर्ण कंकणाचा आवाज (नाद) श्रोत्याला आल्यावाचून रहात नाही.

३) प्रत्येक जीवाला लहानपणी आपल्या आईने कुरवाळल्याचा स्पर्श आठवतोच, परंतु नऊ हजार ओव्यातून या विश्वमाऊलीने आपल्या विविध व्यक्तिरूपानी जीवाला जो स्पर्श केला आहे, तो कुठल्याही साहित्यामध्ये किंवा तत्त्वज्ञानामध्ये दिसून येत नाही आणि म्हणूनच तेराव्या अध्यायामध्ये ते लिहितात-

'ते वाट कृपेची करितु । ते दिशाचि स्नेहभरितु ।
जीवातळी आंथरितु । आपुला जीवु ॥'

किंवा ' कां नाभिकारा उचलिजे । हातु पडलिया देइजे ।
नातरी आर्तातें स्पर्शिजे । आळुमाळु ॥
पावोनि तो स्पर्शु । मळयानिळु खरपुसु ।
येणें मानें पशु । कुरवाळणे ॥'

असा परतत्वाचा स्पर्श श्री ज्ञानेश्वर महाराजांशिवाय दुसरा कोण देणार

आहे? आणि याचाच अनुवाद श्री तुकाराम महाराज, 'लावोनिया हात । कुरवाळिला माथा ।' या अभंगानी करतात. म्हणून सर्व सामान्य जीव आपल्या जन्मदात्या आईचे कुरवाळणे विसरू शकत नाही, मग 'सतरावीयेचे स्तन्य देणाऱ्या या विश्वमाऊलीचे कुरवाळणे, स्पर्षणे सातशे वर्षानंतरही अनुभवाजोगे आहे.

४) ज्ञानेश्वरी हा दृष्टीचा म्हणजे डोळ्याचा विषय माऊलीनी करून दाखवला आहे. इथे श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या कविमनाचा साक्षात्कार डोळ्याला होतो. श्री ज्ञानेश्वर महाराजांचे एक एक दृष्टांत म्हणजे एक वेगळी कथा दूरदर्शन वरील धारावाहीत दाखवलेल्या कथेप्रमाणे आपण पाहू शकतो. दृष्टांत घ्यावयाचा झाल्यास, जंगलांमधून एक माणूस जात होता. त्या जंगलामध्ये एका पाणोठ्यावर चिखल होता व त्या चिखलामध्ये एक गाय रूतून बसली होती. ती गाय त्या चिखलातून बाहेर पडण्यासाठी केविलवाणी धडपड करत होती. तिची धडपड पाहून तो माणूस तिला सोडवण्यासाठी सहाजिकच प्रयत्न करतो. ही दृष्टांतातील कथा पुढील ओवीमध्ये दिसते.

'चिखली रूतली गाय । धड भाकड न पाहे ।
जो ती येचिया ग्लानि होये । कालाभुला ॥'

असे दृक्दृष्टांत ज्ञानेश्वरीमध्ये ठिकठिकाणी दिसतात. इतकेंच नव्हे तर श्री ज्ञानेश्वर महाराजांचे उत्तुंग व्यक्तिमत्त्व आपल्याच डोळ्यांनी आपणाला पाहाता येते. किंवा अतीद्रिय परमात्म्याचा साक्षात्कार ही याच ओव्याच्या माध्यमातून त्यांनी घडवून आणलेला आहे. म्हणून ते म्हणतात,

'तेणेकारणे मी बोलेन । बोली अरुपाचे रूप दावीन ।
अतीद्रिंय परि भोगवीन । इंद्रिया करवी ॥'

म्हणून ज्ञानेश्वरी हा 'दिठीचा विषय त्यांनी केला आहे. 'दिसो परतत्व डोळा । पाहो सुखाचा सोहळा ।'

५) सर्वच बाबतीत श्री ज्ञानेश्वर महाराजांचे व्यक्तिमत्व उत्तुंग व वरच्या पातळीवरचे आहे. आजपर्यंत कुठल्याही साहित्यिकानी ज्याचा विचारही केला नाही तो विषय ते सहज मांडून जातात. सर्व धातूमध्ये सोने हे पवित्र मानले जाते. परंतु या सोन्यामध्ये एक कमतरता आहे. म्हणून श्री ज्ञानेश्वर महाराज आपल्या शब्दाला केवळ सोन्याची उपमा देत नाही तर 'सोनया जोडले सौरभ्य जैसे' सोन्याला सुगंध देण्याची किमया ही श्री ज्ञानेश्वर

महाराजांचीच आहे आणि हा सोन्याचा सुगंध गेली सातशे वर्षे महाराष्ट्र सारस्वतामध्ये दरवळत आहे व तो प्रतिदिनी प्रतिक्षणी वाढतच आहे. याच्या पुढे जाऊन श्री ज्ञानेश्वर महाराज आपणाला वेगळ्या सुगंधाच्या विश्वामध्ये घेऊन जातात. सुगंधी वनस्पतीमध्ये स्पर्शाबरोबरच सुगंध देणारा चंदन हा प्रसिद्ध आहे. 'सूरभयती मुखं कुठारस्य' म्हणजे कुऱ्हाडीला देखिल चंदन तोडताना चंदनाचा वास येतो अशी अलौकिक शक्ति असलेल्या चंदनामधील उणीव श्री ज्ञानेश्वर महाराजांनी पाहिली व तिला आपल्या ओव्याद्वारे पूर्णता दिली. ते लिहितात, सर्व जगाला सुगंध देणाऱ्या चंदन वृक्षाला फुले नसावीत हा केवढा दैव दुर्विलास! या सुगंधीवृक्षाची सुगंधी फुले ना कुणी पाहीली, ना स्पर्शली, ना त्यांचा सुवास कुणाला मिळाला. श्री ज्ञानदेवासारख्या तरल कविमनाला या लांछनाची जाण आली आणि चंदनाची फुले व त्या फुलांना अलौकिक सुगंध श्री ज्ञानेश्वर महाराज आपल्या वाङ्मयातून जगाला देतात.

सहाव्या अध्यायात 'माझा मराठाची बोलु कौतुके' या चौदाव्या ओवीपासून तेवीसाव्या ओवीपर्यंत इंद्रिय आणि विषय या मधील वेगळे भांडण दिसून येईल. म्हणून श्री ज्ञानेश्वरी ही केवळ एकाच इंद्रियाची अगर एका विषयाची नाही तर ती सर्वांची व विषात्मक अशी आहे. म्हणून श्री ज्ञानदेवाचे शब्द ही केवळ अक्षरे रहात नाहीत तर त्याला त्यांच्याच भाषेत 'ब्रह्मसांम्राज्यदिपीका' असे म्हटल्यास वावगे होणार नाही. कारण तिची निर्मिती खालील कारणासाठी झाली आहे.

'तैसा वाग्विलास विस्तारु । गीतार्थेसी विश्वभरु ।
आनंदाचे आवारु । मांडू जगा ॥'

गीतेमध्ये हिंदू धर्मशास्त्राचे सर्व अंग बीजरूपाने आले आहे. कर्म ज्ञान व उपासना या मुख्य विषयाबरोबरच सांख्य, योग इत्यादि विषय श्री ज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या अनुभवातून मांडलेले आहेतच. परंतू कलियुगामध्ये सर्व जीवांचा उद्धार करण्यासाठी सर्व शास्त्रांचा तत्त्वज्ञानाचा महासमन्वय ज्ञानदेवानी आपल्या वाङ्मयात केला आहे आणि भक्तिच्या चौकटीत बसवले आहे. श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या कालीधर्म हा कर्मकांडामध्ये गुंतला होता. जातीभेद पराकोटीला गेला होता. समाजाचे प्रबोधन व उद्धरण याची पायमल्ली झाली होती. अशावेळी विश्वस्पर्शी व विश्वाच्या सर्व जीवांचा उद्धार करण्यासाठी

श्री ज्ञानेश्वर महाराजांनी कर्मकांडाला भक्तिची बैठक दिली. 'कर्मे ईशु भजावा' या एका ओवीच्या एका चरणामध्ये श्री ज्ञानदेवांनी कर्म, ज्ञान आणि उपासना एकत्र आणली. कर्माला ईश्वराची प्रतिष्ठा देऊन कर्म हीच ईश्वर पूजा ही भावना कर्माला दिल्यामुळे कर्म हीच भक्ति असा वेगळा साज निर्माण केला. म्हणून ते लिहितात,

'तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्म कुसुमाचीया वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषालायी ॥'

अशा रितीने कर्म, ते कोणतेही असो त्यामध्ये ईश्वरनिष्ठा आणली गेली. मग ते कर्म सजन कसायासारखे मांस विक्रीचे असो, चोखोबासारखे ढोर ओढण्याचे असो, रोहिदासासारखे चर्मकाराचे असो वा श्रीनाथ महाराजासारखे ब्रह्मकर्म असो, त्या कर्मामध्ये भाव कोणता हे भक्तिच्या माध्यमातून श्री माऊलींनी जगाला दिले आणि म्हणूनच एखादा सावतोबा 'कांदा मुळा भाजी' अवघि विठाई माझी ।' असे म्हणू लागला तर श्री तुकाराम महाराज 'अवघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठल स्वरूप म्हणोनिया ।' या भावनेने कर्म करू लागले. असा ब्रह्मरूप संसार हाच सुखाचा मार्ग आणि हाच भक्तिचा नवअविष्कार श्री ज्ञानेश्वर महाराजांनी घडविला आहे.

ज्ञानमार्ग हा मोक्षाचा मार्ग 'ज्ञानादेवतु कैवल्यम्' असे गीताकार सांगतात व यासाठी शमदमादिमार्ग मुमुक्षत्व ही साधने सांगितली आहेत. ज्ञानासारखे पवित्र जगामध्ये काहीही नाही असे असतानाही केवळ मोक्ष मिळणे हेच साध्य हे श्री ज्ञानेश्वर महाराजांना मान्य नाही म्हणनू ते लिहितात,

'जया सोहंभाव अटकू । मोक्षसुखालागि झाले रंकु ।
तया दिठीचा कलंकु । लागेल तुझिया प्रेमा ॥'

म्हणून ज्ञानाची परीसीमा ती मोक्षामध्ये करत नाहीत तर त्या ज्ञानाला प्रेमभक्तिची जोड देऊन ज्ञानोत्तर प्रेमभक्ति अशी एक वेगळी अवस्था निर्माण करतात. 'ज्ञान गिळोणी गावा गोविंद' या नियमाप्रमाणे ज्ञानदेखील अलिकडची अवस्था आहे, असे श्री ज्ञानेश्वर महाराजांचे मत आहे. यासाठी एक दृष्टांत महत्त्वाचा वाटतो. एका घरामध्ये, चोर आले त्या चोराला घालवण्यासाठी पोलिसाला त्या गृहस्थाने बोलविले. पोलिसांनी चोराला हाकलून दिले. चोराला हाकलल्यानंतर पोलिस जाण्याची वाट तो गृहस्थ बघू लागला परंतु पोलिस तेथून जाण्याची चिन्हे दिसेनात आणि जोपर्यंत पोलिस जात नाहीत तोपर्यंत

त्या गृहस्थाचे जीवनही व्यवस्थित होत नाही. म्हणजे जीवाचे अज्ञान जाण्यासाठी (चोर जाण्यासाठी) ज्ञानाची (पोलिसाची) गरज आहे. पण तेच ज्ञान भक्तसुखाचे जे चिरंतन साध्य आहे, त्याला भेटत नाही. म्हणूनच श्री तुकाराम महाराज म्हणतात-

'नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिती भाव ।
मी भक्त तू देव ऐसे करी ॥'

याचसाठी सोऽहम ज्ञानाला श्री ज्ञानेश्वर महाराज 'अटकु' असे म्हणतात. म्हणून ज्ञानामुळे सायुज्य मुक्ति मिळेलच, परंतु परमेश्वराच्या भक्तिसुखाचा आनंद मिळणार नाही.. म्हणून 'शिवंभूत्वा शिवंयजेत' या न्यायाप्रमाणे ज्ञानीभक्त 'मीच होऊनी पांडवा करिती माझी सेवा' हे भक्तिचे वेगळे स्वरूप श्री ज्ञानदेवांनी सांगितले आहे. म्हणून भक्ति आणि भक्त याचे वर्णन करताना त्यांची प्रतिभा बहारून येते.

'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥'

असा हा भक्तियोग श्री ज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या आयुष्यामध्ये करून दाखविला. प्रत्येक भूतामध्ये भगवंत आहेच 'जीवो ब्रह्मैव ना परः ।' किंवा 'अणोरणियां महतो महीयां' या श्रुति वाक्याप्रमाणे केवळ सजीव जीवातील परमात्म्यालाच श्री ज्ञानदेवांनी साद घातली नाही तर भींतितील निर्जीव परमेश्वराचे आस्तित्व जागृत केले. म्हणून श्रीनाथ महाराज लिहितात,

'निर्जीव चाले भींती महीमा अगाध ।'

श्री ज्ञानेश्वर महाराजांनी भींत चालवून कुठलाही चमत्कार केला नाही किंवा लोकांना चमत्कार दाखवण्यासाठी भींत चालवली नाही. तर विश्वातील जड वा चेतन सजीव वा निर्जीव अशा प्रत्येक वस्तूमात्रामध्यें भगवंत आहे हे केवळ शब्दज्ञान नाही तर ते अनुभवजन्य ज्ञान आहे. हे भींत चालवून त्यांनी सिद्ध केले. म्हणून ते लिहितात,

'साचृची बोलाचे नव्हे हे शास्त्र । संसार जिणते शस्त्र ।
आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरी इये ।'

हा भक्तिचा अनुभव त्यांना आला याचे कारण ते स्व-रूपापासून विश्व-रूपापर्यंत गेले होते.

'हे समस्त श्री वासुदेवो । ऐसा प्रतिति रसाचा वोतला भावो ।
म्हणोनि भक्तामाजि रावो । आणि ज्ञानिया तोची ॥'

आणि म्हणून ज्ञानेश्वर महाराजांच्या भक्तिचे वैशिष्ट हे कि त्यांची भक्ति ही व्यक्तिपूर्ती मर्यादित ठेवली नाही तर ती विश्वात्मक केली. त्यामुळे विश्व व भक्त यामध्ये फरक न मानता खरे विश्वरूप दर्शन भक्तिमध्ये आहे हे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले आणि अशा भक्तिमार्गावर आरूढ होण्यासाठी अधिकाराचे बंड त्यांनी मोडून काढले. वेदाचे कृपणपण फेडिले. वेद केवळ त्रयवर्णिकासाठी होते. स्त्रि शुद्रांना वेदाधिकार दिला गेला नव्हता. परंतु श्री ज्ञानेश्वर महाराजांनी केवळ स्त्रि शुद्रांनाच नव्हे तर भींत चालवून निर्जीवांना व रेड्यामुखी वेद बोलवून पशुनाही भक्तिमार्गावर आणले. 'सहज स्वरूपस्थिती । तया नाव भक्ति ।' अशी भक्तिची सोपी व्याख्या करून जो देवापासून विभक्त नाही तो भक्त असा साधा मंत्र जगाला दिला.

'आपणचि विश्व जाहला । तरी भेद भावो सहजचि गेला ।
म्हणौनि द्वेशु ठेला । जया पुरुषा ॥'

अशा विश्वात्मक व्यक्तिमत्त्वाची कल्पना केवळ श्री ज्ञानदेवीमध्येच आपणाला आढळते. त्याचबरोबर श्री अमृतानुभवामध्ये एका सुंदर दृष्टांतासह ते भक्तिचे मर्म वर्णन करतात.

एकदा काय झाले? मिठाचा मोठा खडा समुद्राजवळ गेला. तो अफाट समुद्र पाहिल्यानंतर त्या समुद्राएवढे होण्याची त्याला इच्छा झाली. परंतु खडा या रूपानी असलेले आस्तित्व याचा त्याग करणे आवश्यक असते. या आस्तित्वाचा त्याग केल्याशिवाय सिंधुत्व प्राप्ति नाही. त्याप्रमाणे जीवाला 'अहं' चा त्याग केल्याशिवाय शिवपद मिळत नाही.

'सांडून मीठपणाचा लोभु । मिठे सिंधुपणाचा घेतला लाभु ।
तैसा अहं देवुनिया शंभु । शांभवि जालो ॥'

परंतु केवळ विश्वात्मक होण्यामध्येच श्री ज्ञानदेवाच्या भक्तिचे रहस्यच नाही तर विश्वरूप होऊन ही भक्ति श्री ज्ञानदेवांना अभिप्रेत आहे. 'म्हणून ते अशा चहु पुरुषार्थाच्या शिरी असणाऱ्या 'गुरवीभक्ति'बद्दल ते लिहितात,

'हे विश्वचि माझे घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥

मग याही वरी पार्था । माझ्या भजनी आस्था
तरी तया त मा माथा । मुगुट करी ॥
जे पुरुषार्थ सिद्धि चौथी । घेवोनि आपुलिया हाती ।
रिगाला भक्ति पंथी । जया देतु ॥
कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडी बांधी करी ।
की जळाचिये परी । तळवटु घे ॥
पार्था गा जणी । तेचि भक्त तेचि योगी ।
उत्कंठा तया लागी । अखंड मज ॥

श्री ज्ञानेश्वर महाराजांनी वर वर्णन केल्याप्रमाणे पाचवा पुरुषार्थ निर्माण केला आहे. श्री तुकाराम महाराज या भक्तिचा मागोवा घेताना लिहितात,

'पायीक पण गेले स्वामी होवोनिया ठेले ।
परि नाही विसरले पायीकपणा ।'

या पायीकपणामध्येच भक्तिचे खरे सुख व रहस्य आढळून येते. या भक्तिच्या स्वरूपाची खरी उकल व्हावयाची झाल्यास आपणाला श्री नाथांच्या जीवनाकडे पाहावे लागेल. श्री एकनाथ महाराजांच्या घरी बारा वर्षे प्रत्यक्ष भगवान घरातील सर्व कामे करीत होता. कल्पना करा कि श्री नाथ महाराज हे देवपूजा करण्यास बसले आहेत व त्या देवपूजेसाठी फुले आणणे, गंध उगळणे इत्यादि कामे श्रीखंड्या रूपाने देवच करीत आहे म्हणजे देवपूजा करणारे श्रीनाथ हे ही देवच ज्याची पूजा चालू आहे तोही देवच व देवपूजेला साहित्य देणारा तोही देवच. तरीही देवपूजा सुटत नाही. पायीकपण जात नाही व सेवेतील समाधान कमी होत नाही आणि या सर्व भावांचा सर्व पैलुंचा विचार श्री ज्ञानेश्वर महाराज एका आगळ्या वेगळ्या दृष्टांतामध्ये आपणाला देतात.

एक सोन्याचा पर्वत आहे. त्या पर्वताचा एक भाग कोरून एका कारागिराने एक सुंदर देवालाय निर्माण केले, त्या देवालयामध्ये सुंदर गाभारा व सिंहासन तयार केले. त्या सिंहासनावर सुंदर मूर्ति निर्माण केली व त्या देवापुढे एक भक्त ही उभा केला. या मध्ये देव व भक्त याचे वेगळेपण खरे का देव देऊळ भक्त यामध्ये असणारे सोन्याचे साम्य खरे याचा उलगडा श्री ज्ञानेश्वर महाराजांनी भक्तिच्या व्यवहारात केला आहे आणि अभेद भक्तिचे एक वेगळे स्वरूप दाखविले आहे.

'देव देऊळ परि वारूं । की जे कोरून डोंगरू ।
तैसा भक्तिचा व्यवहारू । का न व्हावा ?'

अशा तऱ्हेने एका उच्च पातळीवर भक्ति नेऊन ती प्राप्त होण्याचा सोपा मार्ग म्हणजे शुद्ध भावाचा मार्ग श्री मांऊलीनी आपल्याला हरिपाठामध्ये सांगितला आहे.

'भावे विण भक्ति भक्तिविण मुक्ति
बळेविण शक्ति बोलु नये'

शुद्ध भावाशिवाय भक्ति नाही आणि शुद्धं भाव निर्माण होण्यासाठी शुद्ध विचाराची गरज असते. हा शुद्ध विचार श्री ज्ञानेश्वर महाराजानी आपणाला दिला. अशा संताचे वर्णन ते खालीलप्रमाणे करतात-

'ते चालते ज्ञानाचे बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ ।
येर माणुसपण भांब । लौकीक भागु ॥'

वास्तविक पाहाता ही ओवी म्हणजे श्री ज्ञानेश्वर महाराजांचेच वर्णन आहे. असा हा महान योगी नाथ सांप्रदायाचा कापडी, शैव सांप्रदायाचा अभिमानी जेव्हा या सर्व तत्वज्ञानाना घेऊन खांद्यावर वारकऱ्याची पताक घेतो व पंढरीच्या वाटेला लागतो तेव्हा भक्तिची ज्ञानगंगा दुथडीने वाहू लागते. व सर्व जगाचे पाप ताप फेडीत हा ज्ञानियाचा सूर्य जगाचे अंधपण फेडीत विश्वप्रदिक्षणेला निघाला आहे. पण ही प्रदक्षण करत असताना त्याचे हात मोकळे रहात नाहीत किंवा त्याची प्रदक्षणा कधीही संपत नाहीत कारण जगदोध्दार ही न संपणारी क्रिया आहे. म्हणूनच खालील ओवीमध्ये 'रिगाला भक्तिपंथे' असा रीती वर्तमान काळ घालून भक्तिपंथाचे मार्गक्रमण कसे नित्य चालू आहे हे सुचवितात.

जे पुरूषार्थ सिध्दे चौथी । घेवोनि आपुल्या हाती ।
रिगाला भक्तिपंथी । जगा देतु ॥'

**श्री ज्ञानेश्वरी – "एक सिध्द मंत्र आहे"**

श्री ज्ञानेश्वरी एक सिद्धमंत्र आहे. हे श्री माऊलीनी हा आपल्या सर्व सामर्थ्याचा उपयोग करून सिध्द केलेला मंत्र आहे.

"माझ्या सत्यवादाचे तप । वाचा केले बहुत कल्प "

याप्रमाणे या मंत्राच्या उच्चाराने (पारायणानी) शक्ती निश्चितच निर्माण

होते. कोठलाही मंत्र हा शक्तीशाली असतोच हे भारित विज्ञानानी सिध्द केले आहे. मंत्रोचारण केल्याने जी ध्वनीकंपने तयार होतात त्यामुळे वातावरणातील अणू (electrified) होतात. त्यामध्ये चेतना निर्माण होते. त्यामुळे ज्ञानेश्वरीतील प्रत्येक अक्षराला व शब्दाला मंत्राचे सामर्थ्य प्राप्त झाले आहे म्हणून ज्ञानेश्वरी हा केवळ टीकात्मक ग्रंथ नाही तत्त्वज्ञान सांगणारा ग्रंथ नाही तर ज्ञानेश्वरी हा एक सिध्द मंत्र आहे.

वेद, तंत्र, आगमादि ग्रंथ इतकेच काय पुराणामध्येही अनेक देवतांचे वेगवेगळे मंत्र सांगितले आहेत परंतु हे मंत्र सिध्द करावे लागतात. त्याचे पुरश्चरण करावे लागते. ज्ञानेश्वर महाराजानी मंत्र शब्दाची किंवा प्रकीयेची फार सुंदर उकल केली आहे ते म्हणतात आपल्या भाषेमध्ये ५२ अक्षरे आहेत. कुठलाही मंत्र या ५२ अक्षराशिवाय नाही म्हणून कोणी एखाद्याने ही ५२ अक्षरे ओळीने म्हटले म्हणजे मंत्राचा उच्चार आपोआप होईल असे म्हणणे हास्यास्पद आहे-

''अगा बावन्न वर्णा परता । कोण मंत्र आहे पडु सुता । का
बाबन्नही उच्चारता । जिऊ आथी ।

म्हणून शब्द हे सिध्दांच्या मुखातून येत नाही तोपर्यंत ते मंत्र सिध्द होत नाही. समग्र ज्ञानेश्वरी ही एका सिध्दाच्या तपाचे फळ असल्याने तो एक सिध्दमंत्र आहे ज्याच्या श्लोकातून ओव्यातून गायत्रीला फुले व फळे आलेला आहेत

तो गीतेचिया बाहाळी । वेद बीज गेले पाहावी ।
की गायत्री फुली फळी । श्लोकाच्या आली ॥

अ. १८/१५११

अशा एका सिध्दाने आपल्या अत्यंत आवडत्या गुरुला पसायदान मागितले. ज्ञानेश्वरीतील पसायदान हे अत्यंत उच्च कोटीचे प्रकरण आहे प्रत्येक देशाला एक राष्ट्र गीत असते. परंतु माऊलीची दृष्टी देश कालापुरुती मर्यादित नाही त्यांच्या पुढे एक ब्रह्मांड नाहीतर १४ ब्रह्मांडासाठी गीत गावयाचे होते म्हणून माऊलीने निर्माण केले एक ब्रह्माडगीत

''पसायदान - एक ब्रह्मांड गीत''

येणे कारणे मी बोलेन । बोली अरूपाचे रूप दावीन ।
अंर्तद्रीय परि भोगवीन इंद्रिया करवी ।

ही कोण्या एका सोम्या गोम्याची प्रतिज्ञा नाही तर प्रतिज्ञा पर्ण करण्यासाठीच अवतारला आलेल्या सर्मथाची प्रतिज्ञा आहे. त्यामुळे पसादायातील मागण्या एकापेक्षा एक सरस व जीवाला वेगळ्या स्तरावर घेऊन्न जाणाऱ्या आहेत तर विश्वशांतीसाठी ''भूता परस्परे मैत्र जीवाचे'' हे एका दृष्टंयाचे स्वप्न आहे. वैधिक बंधुत्वाची ही अचाट मागणी केवळ माऊलीच करू शकेल. खल निर्दलापेक्षा खलप्रवत्तीचा निरास हा विषय आजच्या व उद्याच्याही काळाची गरज आहे अणुयुध्दाच्या टोकावर असलेल्या जगाला तारणारे तत्वज्ञान म्हणजे पसायदान होय.

जीवनाच्या दृष्ट व अदृष्ट विजयासाठी हे पसायदान आहे. त्यामुळे ते जीवनाच्या सर्व पैलुला स्पर्श करणारे असे आहे.

श्री ज्ञानेश्वर महाराच्या समाधीच्या सप्तशताब्दीचा योग साधून सोलापूरच्या श्री ज्ञानेश्वर माऊली सेवा मंडळ या संस्थेनी ही ज्ञानदेवी प्रत्येकाच्या घरी पोहचण्यासाठी स्वस्त प्रकाशन केले आहे. त्याचे कौतुक करावे तेवढे थोडे आहे. सर्व वारकरी समाज त्याबद्दल ऋणी आहे. दा. का. थावरे उर्फ भाऊ हे जगबंधुच आहेत. त्याचा हा अट्टहास आहे की ज्ञानेश्वरी सर्वांनी वाचावी या समर्पित जीवनाचा हा ध्यास आज प्रकाशनाने पूर्ण होत आहे.

हा वाक्पुष्पांजली विश्व माऊलीच्या चरणी समर्पित करून

जो जे वाछिल तो ते लाहो

ही प्रार्थना

श्री क्षेत्र पंढरपूर
चैत्र शु ॥ १ शके १९१८

श्री विवेकानंद ज्ञानेश्वर वासकर
वासकर वाडा
पंढरपूर

:वै. ह. भ. प. रंगनाथ महाराज परभणीकर:
यांची सोलापूर येथील नगरेश्वर मंदिरांत
श्री दत्तात्रेय रंगनाथ पंपटवार यांनी बसविलेली मूर्ति

# : श्री अक्कलकोट स्वामीसमर्थ :

विपायें जरी आठवला चित्ता । तरी दे आपुली योग्यता ।
हे असो तयातें प्रशंसितां । लाभु आथी ॥

श्रीज्ञानेश्वरी ६.१०४

**धन्य ते संसारी । दयावंत जे अंतरी ॥**
**– श्रीतुकाराम**

वै. महिजीभाई मोतीभाई पटेल

वै. कमलाबेन महिजीभाई पटेल

वै. पार्वतीबाई रंगनाथ पंपटवार

हरिभक्त वै. गयाबाई बाबाजी यरमवार

## वै. ह. भ. प. प्रा. शं. वा तथा सोनोपंत दांडेकर

बाहेरीं कर्मे क्षाळला । भीतरीं ज्ञाने उजळला ।
इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ॥
ज्ञानेश्वरी - १३-४६३

येथें उपकारांसाठी । आले घर ज्या वैकुंठी ॥

– श्रीतुकाराम

वै. नरहरी गोविंद खंडाळकर

वै. भागीरथीबाई नरहरी खंडाळकर

वै.ह.भ.प. गणपत नरहर पाटील
(विरवडे बु.)

कर्मयोगी वै. नामदेव तथा तात्या
शिवरामजी हराळकर

## ह. भ. प. क्षत्रीय ब्रह्मनिष्ठ श्रीरंगनाथ महाराज परभणीकर

कां रत्नाचें दळवाडें । जैसें सबाह्य चोखडें ।
आंत बाहेरी एके पाडें । सूर्यु जैसा ॥
– ज्ञानेश्वरी १३.४६२

मधुरा वाणी ओठीं । तुका म्हणे वाव पोटीं ॥
– श्रीतुकाराम

वै. गुंडप्पा सोमण्णा रघोजी

वै. श्रीगंगम्मा गुंडप्पा रघोजी

वै. गोविंदराव सखाराम शेटे

वै. हरीभक्त तुलसीराम गिलडा शेडम् (गुलबर्गा)

## वै. परमभागवत धुंडामहाराज देगलूरकर

म्हणे शचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे ।
आंग मन जैसें । कापुराचें ॥
– ज्ञानेश्वरी १३.४६१

काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनी विठ्ठल ॥
– श्रीनिळोबाराय

वै. नंदलालजी मानधनिया

वै. तुळसाबाई मानधनिया

वाचावी ज्ञानेश्वरी । डोळां पहावी पंढरी ॥
श्री जनाबाई

वै. ह. भ. प. काशिनाथ गोविंद थावरे गुरुजी

वै. श्रीनिवास विष्णू रायते

तुका म्हणे माय बापें ।
अवघी देवाचीच रूपे ॥

वै. कृष्णावंती सिं. नय्यर

वै. भिमराव गंगाधर नाईक

वै.सौ.शकुंतला सुरेशचंद्र देशमुख

वै.सौ.गीताबाई सखाराम सुरवसे

देवाचा भक्त तो देवासीच गोड ।
श्री तुकाराम

वै. ह. भ. प. भिमाशंकर गंगाधर
कुलकर्णी (मास्तर)

वै. उमावाई भिमाशंकर कुलकर्णी

वै. जगन्नाथ बापूजी जोशी
बोरीवली

वै. इंदिराबाई जगन्नाथ जोशी
बोरीवली

एक गाऊं आम्ही विठोबाचे नाम ।

श्री निकोबाराय

वै. विश्वभंर वैजीनाथराव प्रतापवार परभणी

वै. विश्वनाथ पंढरीनाथ पारसवार

वै. सौ. सुलोचनाबाई भिमाशंकर रघोजी

वै. भिकुअप्पा शिवप्पा कुरा

अमृताची धार । तैसे उजू अंतर ।–ज्ञानदेव
श्री तुकाराम

वै. रामचंद्र मल्लप्पा सुरपूर

वै. सुशीलाबाई रामचंद्र सुरपुर

वै. शांताराम परशुराम पाखरे

वै. देविदास कृष्णात आडेकर

## पंढरीचा वारकरी । वारी चुको नेदी हरी ॥

वै. कै. गंगाधर कृष्णा गायकवाड

वै. विठाबाई उध्दवराव खंडाळकर

वै. रणजीत कोंडीबा चव्हाण

वै. ह. भ. प. जनार्दन बाबाजी डांगे

ॐ

# .. अथ गीताध्यानम् ..

ॐ पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनी -
मम्ब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥१॥
नमोऽस्तु ते व्यास विशालबुध्दे फुल्लारविन्दायतपत्रनेत्र।
येन त्वया भारततैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः॥२॥
प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।
ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥३॥
सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥४॥
वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥५॥
भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गान्धारनीलोत्पला ।
शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला ।।
अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी ।
सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तकः केशवः॥६॥
पाराशर्यवचःसरोजममलं गीतार्थगन्धोत्कटं ।
नानाख्यानककेसरं हरिकथासम्बोधनाबोधितम्॥
लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा ।
भूयाद्भारतपङ्कजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥७॥
मूकं करोति वाचालं पङ्गुं लङ्घयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम् ॥८॥
यं ब्रह्मावरुणेन्द्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवे-
र्वेदैः साङ्गपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः।
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो
यस्यान्तं न विदुः सुरासुरगणाः देवाय तस्मै नमः ॥९॥

• गीता ध्यान समाप्त •

हस्तलिखित : मधुसूदन रायते.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १ ॥

देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु[1] । म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ॥ २ ॥ हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष । जेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ॥ ३ ॥ स्मृति तेचि अवयव । देखा आंगीक भाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥ ४ ॥ अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । पदपद्धति खेवणें । प्रमेयरत्नांचीं ॥ ५ ॥ पदबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर । जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ॥ ६ ॥ देखा काव्यनाटका । जे निर्धारितां सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ॥ ७ ॥ नाना प्रमेयांची परी । निपुणपणें पाहतां कुसरी । दिसती उचित पदें माझारीं । रत्नें भलीं ॥ ८ ॥ तेथ व्यासादिकांच्या मतीं । तेचि मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ॥ ९ ॥ देखा षड्दर्शनें म्हणिपतीं । तेचि भुजांची आकृति । म्हणौनि विसंवादें धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥ तरी तर्कु तोचि फरशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ॥ ११ ॥ एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ॥ १२ ॥ मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ॥ १३ ॥ देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ॥ १४ ॥

१ सकलार्थप्रकाशु (रा).

तरी संवादु तोचि दशनु । जो समता शुभ्रवर्णु । देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ।। १५ ।। मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी । अली सेविती ।। १६ ।। प्रमेयप्रवाल सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ । सरिसेपणें एकवटत इभ- । मस्तकावरी ।। १७ ।। उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें । शोभती भलीं ।। १८ ।। अकार चरणयुगल । उकार उदर विशाल । मकार महामंडल । मस्तकाकारें ।। १९ ।। हे तीन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें । तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ।। २० ।। आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी[1] । ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ।। २१ ।। मज हृदयीं सद्‌गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु । म्हणौनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ।। २२ ।। जैसें डोळचां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे । मग वास पाहिजे तेथ । प्रगटे महानिधी ।। २३ ।। कां चिंतामणी जालियां हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं । तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो म्हणे ।। २४ ।। म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे । जैसें मुळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ।। २५ ।। कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं । ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ ।। २६ ।। तैसा पुढतपुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि । जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ।। २७ ।। आतां अवधारा कथा गहन । जे सकळां कौतुकां जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ।। २८ ।। ना तरी सर्व सुखाचि आदि । जे प्रमेयमहानिधि । नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ।। २९ ।। कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजाता वसौट । अशेषांचें ।। ३० ।। ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ।। ३१ ।। नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि महामतीं । व्यासाचिये ।। ३२ ।। म्हणौनि हा काव्यांरावो[2] । ग्रंथ गुरुवतीचा ठावो । एथूनि रसां झाला आवो । रसाळ-पणाचा ।। ३३ ।। तेवींचि आइका आणिक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक ।

१ चातुर्यकलाकामिनी (रा).
२ महाकाव्यरावो (रा).

